**सन २०१७-१८ मध्ये, "फलोत्पादन पीक संरक्षण" ही योजना जिल्हा वार्षिक योजनेतून वगळून राज्यस्तरीय योजना म्हणून राज्यात राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. पिसंयो-२०१७/प्र.क्र.१०७/९अे**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- १२ जुलै, २०१७.

**वाचा:-**

१. शासनपत्र नियोजन विभाग क्र. डीएपी-१०१६/प्र.क्र.२११/कार्यासन १४८१, दिनांक २०/०२/२०१७.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र. ९४/अर्थ-३, दि.३०/०६/२०१७.
३. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक- कृआ/फलो-३/ /१७-१८/१५९५/१७, दिनांक ०४/०७/२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यातील फळपीके तसेच भाजीपाला पिकांचे उत्पादन व दर्जाची वाढ करण्यावर भर देण्यात येत आहे. यासाठी विविध फळपिके/भाजीपाला पिकावर पडणा-या कीड व रोग यावर त्वरीत नियंत्रण करणे आवश्यक असते. जेणेकरुन उत्पादनात होणारी घट टाळता येते. यासाठी फलोत्पादन पिक संरक्षण योजना राज्यात राबविण्यात येत आहे. संचालक (फलोत्पादन) यांनी सदर योजना सन २०१७-१८ मध्ये राज्यात राबविण्याकरीता रु.३००.२७ लाख निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. सदर योजना सन २०१६-१७ पर्यंत जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत राबविण्यात येत होती. सन २०१७-१८ पासून सदर योजना राज्यस्तरीय योजना म्हणून राबविण्याकरीता, रु. १०० लाख इतक्या निधीची तरतूद सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पामध्ये करण्यात आली आहे. अर्थसंकल्पीत तरतूदीमधून ७०% निधी वितरीत करण्याच्या सूचना वित्त विभागाने संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत. त्यानुसार सदर योजना सन २०१७-१८ मध्ये राज्यात राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ मध्ये "फलोत्पादन पीक संरक्षण" ही रु.३००.२७ लाख निधीची योजना राज्यस्तरीय योजना म्हणून राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून, सदर

योजना राबविण्यासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनानुसार, रुपये ७० लाख (रुपये सत्तर लाख फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१. <u>योजनची उद्दीष्टये</u> – फळपीके, भाजीपाला, फुलपीके, मसाला पीके, औषधी व सुगंधी वनस्पती या पिकांवरील सर्व कीड/रोग नियंत्रणासाठी औषधाचे वाटप/फवारणी कार्यक्रम यासाठी ५० टक्के अनुदान उपलब्ध करून देण्यात येईल. सदर योजनांतर्गत संत्रा पिकावरील काळी/पांढरी माशी (कोळशी), फायटोप्थोरा रोग, आंब्यावरील तुडतुडे व भुरी रोग, चिकुवरील बी पोखरणारी अळी, नारळावरील ईरिओफाईड माईट्स सुपारीवरील कोळेरोग, काजूवरील टी-मॉस्कुटो, केळीवरील करपा, बटाटयावरील करपा रोग, मिरचीवरील चुरडामुरडा, कांदा पिकावरील फुलकिडे व करपा,पानमळयावर करपा या किड /रोगाच्या नियंत्रणासाठी फवारणीचा कार्यक्रम राबविण्यात येईल. त्याचप्रमाणे उपरोक्त पिकाव्यतिरिक्त इतर फळपीके, भाजीपाला, फुलपीके, मसाला पीके, औषधी व सुगंधी वनस्पती या पिकांमध्ये अचानक किड रोगाचा प्रादुर्भाव जिल्हयात आढळून आल्यास त्यावरही जिल्हयाला उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या अधिन राहून पिक संरक्षण कार्यक्रम राबविण्यात येईल.

२. <u>लाभार्थीची निवड</u> – सदर योजनेंतर्गत सर्वसाधारण, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती इत्यादी प्रकारचे शेतकरी पात्र राहतील. तथापि, अल्प भूधारक शेतकरी व अनुसूचित जाती/जमातीच्या शेतकऱ्यांना या योजनेचा प्राधान्याने लाभ देण्यात यावा.

३. <u>अनुदान प्रमाण</u> :- किडरोग नियत्रंणासाठी किटकनाशके/बुरशीनाशके यांची खरेदी संचालक (फलोत्पादन) यांनी मंजूर केलेल्या यादीप्रमाणे शेतकऱ्यांनी करावी. संचालक (फलोत्पादन) यांनी यादी मंजूर करताना किटकनाशके/बुरशीनाशके यांची शिफारस ब्रॅड नावाने न करता, जेनेरिक (Generic) नावाने करावी, जेणेकरून खाजगी कंपनीच्या व्यवसायास मदत करण्याची भूमिका राहणार नाही. महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाची कंपनी, महाराष्ट्र इन्सेक्टीसाइड लिमिटेड (MIL) यांनी स्वत: उत्पादीत केलेली रासायनिक व जैविक किटकनाशके/बुरशीनाशके यांच्या पुरवठ्यासंदर्भात डीबीटी (DBT) चे धोरण लागू होणार नाही. परंतू, महाराष्ट्र इन्सेक्टीसाइड लिमिटेड (MIL) यांची स्वत:ची उत्पादने उपलब्ध नसल्यास, इतर खाजगी कंपन्यांची रासायनिक व जैविक किटकनाशके/बुरशीनाशके यांची खरेदी करण्याची मुभा शेतकऱ्यांना राहील. खरेदीची पावती कृषि विभागाकडे सादर केल्यानंतर अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्यात येईल.

४. <u>अंमलबजावणी करणारी यंत्रणा</u>:- सदर योजना संबंधित विभागीय कृषि सहसंचालक, यांचेमार्फत राबविण्यात येईल.

५. <u>आहरण व संवितरण अधिकारी</u> :- सदर योजनेसाठी संबंधित जिल्हापरिषदेचे कृषि विकास अधिकारी, हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

६. <u>सनियंत्रण आढावा</u> :- संचालक (फलोत्पादन ) कृषि आयुक्तालय, पुणे यांना संनियत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर योजना राबविण्याबाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना, संचालक फलोत्पादन संबंधिताना निर्गमित करतील. संबंधित विभागीय कृषि सहसंचालक, या योजनेचा आढावा घेऊन योजनेच्या पुर्ततेचा अहवाल संचालक फलोत्पादन यांना सादर करतील.

७. या योजनेंतर्गत लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यांची यादी तपशीलासह कृषि विभागाच्या अधिकृत संकेत स्थळावर प्रदर्शित करण्यात येईल.

८. या योजनेसाठी होणारा खर्च रु.७० लाख (रु.सत्तर लाख फक्त) सन २०१७-१८ या वर्षाकरीता मंजूर व अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीनुसार खालील लेखाशिर्षातून भागाविण्यात यावा.

" मागणी क्र.डी -३,
२४०१- पीक संवर्धन,
११९-बागायती व भाजीपाला पिके
(०१) (२०)- पीक संरक्षण योजना
(२४०१ ३२१५)
३३-अर्थसहाय्य."

९. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात आलेल्या शासन निधीचा विनियोग तत्काळ करण्यात यावा. तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचलक फलोत्पादन यांनी शासनास वेळोवेळी उपयोगीता प्रमाणपत्र सादर करावे.

१०. या शासन निर्णयाची अंमलबजावणी काटेकोरपणे होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करतांना सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश आणि भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण यांचे पालन होईल या अटीच्या अधीन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

११. हे आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८/०४/२०१७ व क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.३०/०६/२०१७ मधील अटींची पुर्तता करण्याच्या अधिन राहून, प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१४१५४१५८९८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.07.14 15:39:29 +05'30'

**( क.य.वंजारे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. प्रधान सचिव, (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२
४. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. उपसचिव (फलोत्पादन) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
७. संचालक(फलोत्पादन), आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे
८. सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१०.महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
११.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२.सहाय्यक संचालक (लेखा), आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१३.माहिती व जनसंपर्क संचालनालय (प्रसिद्धीसाठी), मंत्रालय, मुंबई-३२.
१४.निवड नस्ती.